**राष्ट्रीय कृषि विकास योजनेच्या राष्ट्रीय पूरक प्रथिने निर्माण कार्यक्रमांतर्गत मंजूर करण्यात आलेल्या राजारामबापू पाटील सहकारी दूध संघ म., जि.सांगली या संघाच्या वाढीव प्रकल्प किंमतीच्या प्रस्तावास सुधारीत प्रशासकीय मंजूरी देणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**कृषी, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः राकृवि २०१३/प्र.क्र.७८ /पदुम-८**
मंत्रालय- विस्तार, मुंबई ४०० ०३२
तारीख: २ फेब्रुवारी, २०१५

**वाचा** : १. शासन समक्रमांक दिनांक ८.८.२०१३
२. शासन समक्रमांक दिनांक २९.१०.२०१३ व दिनांक ३.१२.२०१३
३. आयुक्त दुग्धव्यवसाय विकास यांचे पत्र क्र. आदुवि -६/RKVY/SPDD-NMPS/भाग ३/२०१४-१५/२९८, दि.१०.१०.२०१४ चे
४.कृषि व पदुम विभागाचे क्र. आरकेव्ही- १११४/सी.आर.५८/आरकेव्हीवाय सेल, दि.७.१.२०१५ अन्वये निर्गमित केलेले राज्यस्तरीय प्रकल्प मंजूरी समितीच्या बैठकीचे इतिवृत्त

**प्रस्तावना :**

राष्ट्रीय कृषि विकास योजनेच्या राष्ट्रीय पूरक प्रथिने निर्माण अभियानांतर्गत राजारामबापू पाटील सहकारी दूध संघ म., जि.सांगली या संघास NMPS हिस्सा व लाभार्थी हिस्सा ७५:२५ या प्रमाणात रु.६.०० कोटी किंमतीच्या प्रस्तावास संदर्भ क्र.१ येथील शासन निर्णयान्वये मंजूरी देण्यात आली होती. निधी प्रमाणकानुसार शासन हिस्सा रु.४.५० कोटी व उर्वरित रु.१.५० कोटी हा संघ हिस्सा असा विभागणी करण्यात आला. दरम्यान संघाने नव्याने प्रकल्प अहवालान्वये संघास मंजूर करण्यात आलेल्या कंडेन्स मिल्क निर्मीती प्रकल्पात दूध भुकटी प्रकल्पाची आवश्यकता विचारात घेवून वाढीव रक्कमेसह एकूण रु २४.४०.कोटी प्रकल्प किंमतीचा प्रस्ताव शासनास सादर केला. आयुक्त, दुग्धव्यवसाय विकास यांनी संदर्भ क्र ३ अन्वये सदर प्रस्ताव विचारात घेण्यास हरकत नसल्याचे शासनास कळविले. राजारामबापू पाटील सहकारी दूध संघ म., जि.सांगली या संघाचा नव्याने सादर करण्यात आलेला प्रकल्प अहवाल राष्ट्रीय कृषि विकास योजनेच्या राज्यस्तरीय प्रकल्प मंजूर समितीच्या दि.१९.१२.२०१४ रोजी पार पडलेल्या बैठकीत सादर करण्यात आला होता. राज्यस्तरीय प्रकल्प मंजूरी समितीने राजारामबापू पाटील सहकारी दूध संघाच्या रु.२४.४० लक्ष इतक्या रकमेच्या प्रकल्प प्रस्तावास केंद्र शासनाच्या NPBBDD या कार्यक्रमासाठी ५०:५० या प्रमाणात निश्चित केलेल्या निधी संरचनेच्या समांतर अर्थसहाय्यावर राष्ट्रीय पूरक प्रथिने निर्माण अभियान कार्यक्रमाचा प्रकल्प राबविण्यास मान्यता प्रदान केली. सदर मान्यतेनुसार राजारामबापू पाटील सहकारी दूध संघ म., जि.सांगली या संघाच्या रु.२४.४० कोटी प्रकल्प किंमतीच्या प्रस्तावास मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :**

शासन या निर्णयान्वये राष्ट्रीय कृषि विकास योजनेअंतर्गत राष्ट्रीय पूरक प्रथिने निर्माण अभियान कार्यक्रमाखाली राजारामबापू पाटील सहकारी दूध संघ म., जि.सांगली या संघास कंडेन्स मिल्क प्रकल्प उभारणीसाठी संदर्भ क्रमांक १ अन्वये देण्यात आलेल्या मान्यतेत बदल करुन राज्यस्तरीय प्रकल्प मंजूरी समितीने दि.१९.१२.२०१४ रोजी दिलेल्या मान्यतेनुसार दूध भुकटी प्रकल्पाच्या वाढीव घटकांसह प्रकल्प उभारण्यास खालील तक्त्यात नमूद केल्याप्रमाणे शासन निर्णयात नमूद अटी व शर्तीच्या अधिन राहून सुधारीत प्रशासकीय मान्यता देत आहे.

(रु. कोटी)

| प्रकल्पाचे नाव - राजारामबापू पाटील सहकारी दूध संघ म., जि. सांगली | दि.१९.१२.२०१४ च्या राज्यस्तरीय प्रकल्प मंजूरी समितीच्या मान्यतेनुसार मंजूर करण्यात येत असलेल्या सुधारीत प्रकल्पाचा तपशील | | | |
|---|---|---|---|---|
| | प्रकल्प किंमत | राकृवियो हिस्सा (५०%) | संघ हिस्सा (५०%) | सुधारीत प्रकल्पासाठी उपलब्ध करुन द्यावयाचा निधी |
| | २४.४० | १२.२० | १२.२० | ९.८० *<br>* संदर्भ क्र. २ च्या शासन निर्णयान्वये वितरीत रु.२.४० कोटी वगळून |

सदर प्रकल्प विहित कालावधीत पूर्ण करण्याबाबतचे विहित नमुन्यातील बंधपत्र व कामांचा आराखडा आयुक्त, दुग्धव्यवसाय यांना संघाने तात्काळ सादर करणे आवश्यक आहे. आयुक्त , दुग्धव्यवसाय यांनी उपरोक्त संघाकडून विधिग्राहय बंधपत्र लिहून घ्यावे व ते शासनास सादर करावे. संघास मंजूर करण्यात आलेला निधी खाली नमूद केलेल्या मंजूर घटकांकरीता संघाने खर्ची घालावा.

(रु.लक्ष)

| अ.क्र. | मंजूर घटक | सुधारीत प्रकल्प किंमत | राष्ट्रीय पूरक प्रथिने निर्माण अभियानांतर्गत शासन निधी (५०%) | संघ हिस्सा(५०%) |
|---|---|---|---|---|
| १ | प्रकल्प इमारत बांधकाम | ७१२.८० | ३५६.४० | ३५६.४० |
| २ | सयंत्र, यंत्रसामुग्री | १६११.२० | ८०५.६० | ८०५.६० |
| ३ | सल्लागार व संनियंत्रण खर्च | ११६.०० | ५८.०० | ५८.०० |
| | एकूण | २४४०.०० | १२२०.०० | १२२०.०० |

## अटी व शर्ती –

१. संघाने बंधपत्रातील नमूद अटी व तरतूदीनुसार प्रकल्प सविस्तर प्रकल्प अहवालानुसार पूर्ण करणे बंधनकारक आहे.

२. मंजूर प्रकल्प किंमतीपेक्षा प्रकल्पावर होणारा अधिकचा खर्च संघ स्वत: सोसेल. वाढीव प्रकल्पावर होणाऱ्या खर्चासाठी शासन जबाबदार राहणार नाही. तसेच त्याकरीता शासनामार्फत मंजूर प्रकल्प किंमती व्यतिरिक्त निधी मंजूर करण्यात येणार नाही.

३. महाराष्ट्र राज्य सहकारी दूध महासंघ मर्या., मुंबई यांना त्यांच्या आवश्यकतेप्रमाणे संघाने दूध पुरवठा करणे आवश्यक राहील.

४. राज्यातील दूध कमतरता / अतिरिक्त दूध उत्पादन काळात राज्य शासनाचा निर्णय संघावर बंधनकारक राहील.

५. मंजूर करण्यात आलेल्या निधी बाबत झालेल्या खर्चाचे स्वतंत्र लेखे जी.एफ.आर.नियम क्रमांक १४९ अन्वये विहित केलेल्या पध्दतीप्रमाणे ठेवावेत व झालेल्या खर्चाचा अहवाल आणि लेख्यांच्या संदर्भात झालेले लेखापरिक्षण या संबंधीची माहिती आयुक्त दुग्धव्यवसाय यांना सादर करावी.

६. सहकारी संघाला मंजूर निधीमधून प्राप्त झालेल्या मिळकतीचे (स्थावर /निमस्थावर) लेखे लेखापरिक्षणास आवश्यकतेप्रमाणे उपलब्ध करुन द्यावेत.

७. संघाला मंजूर करण्यात आलेल्या निधीमधून झालेल्या मिळकतीतील वाढीची विल्हेवाट लावण्यापूर्वी त्यास शासनाची मान्यता घेणे संघास बंधनकारक राहील.

८. संघास उपलब्ध करुन दिलेल्या निधी उपयोगिता प्रमाणपत्र आयुक्त, दुग्धव्यवसाय यांचेमार्फत शासनास सादर करावे. वितरीत केलेल्या निधीचे उपयोगिता प्रमाणपत्र प्राप्त झाल्याखेरीज उर्वरित निधी वितरीत केला जाणार नाही.

९.मंजूर प्रकल्पाची यशस्वीरीत्या अंमलबजावणी करण्याची जबाबदारी संबंधित जिल्हयाच्या जिल्हा दुग्धव्यवसाय विकास अधिकाऱ्याची राहील. तसेच प्रादेशिक स्तरावर प्रादेशिक दुग्धव्यवसाय विकास अधिकारी व राज्यस्तरावर आयुक्त दुग्धव्यवसाय विकास हे संनियंत्रण अधिकारी म्हणून राहतील.

१०.शासन निधी वितरीत होईल त्या प्रमाणात संघ आपला हिस्सा गुंतविल. सदर प्रकल्प राबविणे सोयीचे व्हावे त्यासाठी संबंधित जिल्हयाचे जिल्हा दुग्धव्यवसाय विकास अधिकारी व संघाचे व्यवस्थापकीय संचालक यांचे संयुक्त खाते बँकेत उघडण्यात यावे. या संयुक्त खात्यामध्ये संघाच्या हिस्स्याची रक्कम ज्या प्रमाणात उपलब्ध होईल त्याच प्रमाणात या योजने अंतर्गत मंजूर असलेली तरतूद संबंधित संघास अदा करण्यात येईल. प्रादेशिक दुग्धव्यवसाय विकास अधिकारी सदर रक्कम वितरीत करण्यापूर्वी योजनेसाठी संनियंत्रण अधिकारी असल्यामुळे त्यांची मान्यता प्राप्त करुन घेतल्यानंतरच जिल्हा दुग्धव्यवसाय विकास अधिकारी यांनी रक्कम बँकेतून आहरीत करुन संघास वितरीत करावी.

११. या योजने अंतर्गत मंजूर करण्यात आलेला निधीचा विनियोग योग्यरीत्या न झाल्यास सदर निधी शासकीय नियमानुसार व बंधपत्रातील अटी व तरतूदीनुसार व्याजासहीत संबंधित संघाकडून वसूल करण्यात येईल.

१२.सदर योजने अंतर्गत खरेदी करण्यात येणारे सर्व साहीत्य व उभारण्यात येणा-या प्रकल्पासाठी संघाने निविदा प्रक्रीयेचा अवलंब करावा.

१३. या योजने अंतर्गत बसविण्यात येणा-या साहीत्यांवर तसेच योजने अंतर्गत उभारण्यात येणा-या दुग्धशाळा व दूध प्रक्रीया प्रकल्पावर हा प्रकल्प "राष्ट्रीय कृषि विकास योजने अंतर्गत राष्ट्रीय पूरक प्रथिने निर्माण अभियानांतर्गत प्रकल्प " असे ठळकपणे दर्शनी भागावर नमूद करणे आवश्यक राहील.

१४.संस्थेने सादर केलेल्या प्रकल्प अहवालानुसार राबविण्यात येत आहे किंवा नाही यासाठी योजनेची पुढीलप्रमाणे प्रकल्प अंमलबजावणी समिती स्थापन करण्यात येत आहे.

१) संबंधित जिल्हयाचे जिल्हा दुग्धव्यवसाय विकास अधिकारी -- अध्यक्ष
२) संघाचे अध्यक्ष -- उपाध्यक्ष
३) विभागीय उपनिबंधक सहकारी संस्था (दुग्ध) -- सदस्य
४) संबंधित जिल्हयाचे जिल्हा अधिक्षक, कृषि अधिकारी -- सदस्य
५) संबंधित जिल्हयाचे जिल्हा पशुसंवर्धन, उपआयुक्त -- सदस्य
६) आयुक्त दुग्धव्यवसाय यांनी नियुक्त केलेला -- सदस्य
७) संबंधित संघाचे व्यवस्थापकीय संचालक -- सदस्य सचिव

उपरोक्त समितीने आपला अहवाल वेळोवेळी शासनास व आयुक्त दुग्धव्यवसाय विकास यांना सादर करावा.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०२०२११३६०४३३०१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Sathe Shashank M

Digitally signed by Sathe Shashank M
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=Agri & ADF, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Sathe Shashank M
Date: 2015.02.02 11:45:32 +05'30'

**(श.मा.साठे)**
उप सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१) मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव
२) मा.उपमुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव

३) मा.मंत्री (कृषि ), मा.मंत्री (पदुम), मा.राज्यमंत्री (पदुम)यांचे खाजगी सचिव
४) अपर मुख्य सचिव (कृषि) यांचे स्वीय सहायक, कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई
५) मा.सचिव (पदुम) यांचे स्वीय सहायक, कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई
६) आयुक्त (कृषि) महाराष्ट्र राज्य, पुणे
७) आयुक्त पशुसंवर्धन, महाराष्ट्र राज्य, पुणे
८) आयुक्त दुग्धव्यवसाय विकास, महाराष्ट्र राज्य, वरळी, मुंबई-४०० ०१८
९) व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य सहकारी दूध महासंघ म., पश्चिम द्रुतगती मार्ग, गोरेगाव, मुंबई
१०) प्रादेशिक दुग्धव्यवसाय विकास अधिकारी,पुणे विभाग,पुणे
११) विभागीय उपनिबंधक सहकारी संस्था (दुग्ध) पुणे विभाग, पुणे
१२) जिल्हा दुग्धव्यवसाय विकास अधिकारी, सांगली
१३) जिल्हा पशुसंवर्धन उपआयुक्त, सांगली
१४) जिल्हा अधिक्षक, कृषि अधिकारी, सांगली
१५) महालेखापाल १/२, महाराष्ट्र (लेखा व अनुज्ञेयता/ लेखा परिक्षा), मुंबई/ नागपूर
१६) कक्ष अधिकारी, राकृवियो कक्ष, कृषि व पदुम विभाग, मुंबई
१७) व्यवस्थापकीय संचालक, राजारामबापू पाटील सहकारी दूध संघ म., जि.सांगली
१८) निवड नस्ती